**अर्भक मृत्यु दर कमी करण्यासाठी १३ व्या वित्त आयोगाकडून प्राप्त विशेष प्रोत्साहन अनुदानाची रक्कम रु. २३,०४१.८४ लाख वितरीत करण्याबाबत....**

## महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग

**शासन निर्णय क्रमांकः** सा.आ.वि. -३००११/४८/२०१५/आ-७
गो. ते. रुग्णालय, संकुल इमारत,
१० वा मजला, नवीन मंत्रालय, मुंबई
दिनांक: ९ मार्च, २०१५

**वाचा :**

१) केंद्र शासनाचे वित्त मंत्रालयाचे पत्र क्रमांक -एफ़ -३१ (२)/एफ़सीडी/२०१२, दि. २७/१२/२०१२.
२) केंद्र शासनाचे वित्त मंत्रालयाचे दि. २६/०९/२०१३ चे पत्र.
३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांक -राग्राआ-२०१३/प्र.क्र. १३३/आ-७, दि. १३/११/२०१३
४) शासन निर्णय क्रमांकः सा.आ.वि. -३००११/४३/२०१४/आ-७, दि. २७/०३/२०१४
५) शासन पत्र क्र. सा.आ.वि.-३००११/१०८/२०१३/आ-७, दि. १७/०१/२०१५

**प्रस्तावना :**

१३ व्या वित्त आयोगाकडून अर्भक मृत्यु दर कमी करण्यासाठी प्रोहत्सानात्मक अनुदानाचा पहिला हफ्ता रु. १३,३०८.०० लाख केंद्र शासनाच्या उपरोक्त दि. २७/१२/२०१२ च्या पत्रान्वये व उपरोक्त दि. २६/०९/२०१३ च्या पत्रान्वये दुसरा हफ्ता रु. ९,८२७.०० लाख असे एकूण २३,१३५.०० लाख प्राप्त झाले आहेत. सदर अनुदान अर्भक मृत्यु दरामध्ये घट करणे या प्रयोजनासाठीच वापरण्यात यावे अशा केंद्र शासनाच्या सुचना आहेत. सदर अनुदानाचा विनियोग योग्य त-हेने होण्यासाठी, केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनांनुसार मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली उच्चस्तरीय संनियंत्रण समिती उपरोक्त दि. १३/११/२०१३ च्या शासन निर्णयानुसार गठीत करण्यात आली आहे. सदर उच्चस्तरीय संनियंत्रण समितीने दि. २३/१२/२०१४ च्या बैठकीमध्ये अर्भक मृत्यु दर कमी करण्यासाठी आवश्यक बाबींवर खर्च करण्यासाठी याबाबतच्या रु. २३,१३८.०० लाखाच्या कृती आराखड्यास मंजूरी दिली आहे. केंद्र शासनाकडून प्राप्त एकूण रु. २३,१३५.०० लाख अनुदानापैकी उपरोक्त दि. २७/०३/२०१४ च्या शासन निर्णयान्वये रु. ९३.१६ लाख वितरीत करण्यात आले असून उर्वरीत रक्कम वितरीत करण्याची तसेच उच्चस्तरीय नियंत्रण समितीने उपरोक्त दि. १७/०१/२०१५ च्या पत्रा सोबतच्या इतिवृत्तान्वये मान्य केलेल्या कृती आराखड्यानुसार अर्भक मृत्यु दर कमी करण्यासाठी विशिष्ठ बाबींवर खर्च करण्याकरीता मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :**

१३ व्या वित्त आयोगाकडून अर्भक मृत्यु दर कमी करण्यासाठी प्राप्त झालेले प्रोहत्सानात्मक अनुदान रु. २३,०४१.८४ लाख वितरीत करण्यास शासन मंजूरी देत आहे. केंद्र शासनाकडून प्राप्त

एकूण रु. २३,१३५.०० लाख अनुदानाचा विनियोग मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय संनियंत्रण समितीने मान्यता दिलेल्या कृती आराखड्यानुसार करण्यात यावा.

२. मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय संनियंत्रण समितीच्या बैठकीच्या इतिवृत्ताप्रमाणे कृती आराखड्याचे भौगलिक लक्ष निश्चित करावे. इतिवृत्तातील प्रत्येक बाबींवर खर्च करण्यासाठी शासनाने वेळोवेळी विहित केलेली कार्यपध्दती अवलंबण्यात यावी.

३. सदर निधी सह संचालक (अ. व प्र.), आरोग्य सेवा, मुंबई तथा नियंत्रक अधिकारी यांच्या अधिनस्त ठेवण्यास शासन मंजूरी देत आहे. तसेच प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना आहरण व संनियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी सदर रकमेचे देयक आवश्यकतेनुसार कोषागारात सादर करुन रक्कम कोषागारातून काढून ती खर्च करण्यासाठी आयुक्त (कु.क) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांना उपलब्ध करुन द्यावी. आयुक्त (कु.क) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी सदरची रक्कम संबंधित कार्यक्रम अधिका-यांकडे पुढील कार्यवाहीसाठी सपुर्द करावी.

४. सदर प्रस्तावावरील खर्च मागणी क्रमांक आर -१, २२१० - वैद्यकीय शिक्षण व सार्वजनिक आरोग्य, ०६- सार्वजनिक आरोग्य, ८०० - इतर खर्च, ०१- किमान गरजा कार्यक्रम, (०१) (१७) - अर्भक मृत्यु दर कमी करण्यासाठी १३ व्या वित्त आयोगाकडून प्राप्त विशेष अनुदान, ३१- सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) (२२१० एफ़ ०७७) या लेखाशीर्षाखाली मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या व वित्त विभागाच्या व्यय १३, आर्थोपाय, वित्त आयोग कक्ष व अर्थ-९ शाखेच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २८/२०१५/विआक व ४०/अर्थ-९, दि. ७/२/२०१५ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३०७१२००५८०५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manohar Sadhu Thombare

Digitally signed by Manohar Sadhu Thombare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Manohar Sadhu Thombare
Date: 2015.03.09 19:15:33 +05'30'

मनोहर ठोंबरे
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.

२. महालेखापाल, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.

३. आयुक्त (कु.क.) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.

५. अतिरिक्त संचालक, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे.

६. सह संचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, मुंबई.

७. सहायक संचालक, अर्थ व प्रशासन, पुणे.

८. प्रशासकीय अधिकारी (आहरण व संवितरण अधिकारी), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.

९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

१०. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.

११. वित्त विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.

१२. आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

१३. सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प शाखा) मंत्रालय, मुंबई.

१४. सार्वजनिक आरोग्य विभाग (लेखा शाखा) मंत्रालय, मुंबई.

१५. निवड नस्ती (आरोग्य-७).